"वार्षिक योजना २०१४-१५ पुरवणी मागणी प्रस्ताव (डिसेंबर - २०१४) --- व्यावसायिक शिक्षण संचालनालयांतर्गत विविध योजनेसाठी पदे निर्माण करणे (२२०३ २९२९)"

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : अर्थसं २४११/२०१४/४९/प्र. क्र.७५/व्यशि-२,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २० फेब्रुवारी, २०१५.

वाचावे :- (१) संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : ५/व्यशि/नियोजन/पुमा/२०१४-१५/२८९, दिनांक : २०.१०२०१४.
(२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक : पूरक २०१४/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३, दिनांक : ०१ जानेवारी, २०१५.
(३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक : पूरक २०१५/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३, दिनांक : ३१ जानेवारी, २०१५.

**प्रस्तावना :-**

संचालनालयाने संदर्भाधीन पत्र क्रमांक (१) अन्वये, "व्यवसाय शिक्षण संचालनालयांतर्गत विविध योजनेसाठी पदे निर्माण करणे" या योजनेंतर्गत, "मागणी क्रमांक : डब्लू-३, २२०३ तंत्रशिक्षण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०१)(०९) व्यावसायिक शिक्षण संचालनालयांतर्गत विविध योजनेसाठी पदे निर्माण करणे(राज्य योजना)(२२०३ २९२९)" या लेखाशीर्षाखाली डिसेंबर, २०१४ च्या हिवाळी अधिवेशनात रुपये १४२.५० लक्ष ( इतका निधी पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता.सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. त्याअनुषंगाने, वित्त विभागाने संदर्भ क्रमांक ( २ ) च्या परिपत्रकान्वये सन २०१४-१५ या वर्षाचे खर्चाचे पूरक विवरणपत्र दिनांक ८ डिसेंबर, २०१४ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आले असल्याचे व पुरवणी खर्चास विधानसभेने मान्य दिली असल्याचे कळविले आहे. तसेच, पुरवणी विनियोजन विधेयकास मा. राज्यपालांनी संमती दिली असल्याने आणि ते महाराष्ट्र (तृतीय पुरवणी ) विनियोजन अधिनियम, २०१४ ( सन २०१४ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-३९) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग -४ दिनांक २३ डिसेंबर,२०१४ यामध्ये प्रसिध्द करण्यात आला असल्याने, आकस्मिकता निधीतून काढलेला निधी यापुढे आकस्मिकता निधीच्या खर्च खाती न टाकता, एकत्रित निधीच्या खाती खर्ची टाकण्याच्या सूचना सर्व संबंधिता तात्काळ देण्याचे व पुरवणी विनियोजन विधेयकानुसार मंजूर झालेल्या पूरक मागण्यांच्या रकमांचे आवश्यकतेनुसार वाटप करण्याचे निर्देशित केले आहे. तसेच, पूरवणी मागणीचा निधी वितरण करंताना वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक (३) च्या परिपरित्रकात दिलेल्या निर्देशानुसार कार्यवाही करण्याचे सूचित केले आहे.

**शासननिर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या प्रस्तावास, वित्त विभागाने सन२०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी, "मागणी क्रमांक : डब्लू-३, २२०३ तंत्रशिक्षण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०१) (०९) व्यावसायिक शिक्षण

संचालनालयांतर्गत विविध योजनेसाठी पदे निर्माण करणे (राज्य योजना) (२२०३ २९२९)" या लेखाशीर्षाखाली, "आकस्मिकता निधीतून काढलेला निधी यापुढे आकस्मिकता निधीच्या खर्च खाती न टाकता, एकत्रित निधीच्या खाती खर्ची टाकणे" या अटीच्या अधीन राहून अर्थसंकल्पीत केलेला रुपये १४२.५० लक्ष (रुपये एक कोटी बेचाळीस लक्ष पन्नास हजार फक्त) इतका निधी खर्च करण्यास मंजूरी दिली आहे.

२. हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक : ४२६/प्रसनिवि, दिनांक ३०.०१.२०१५ व वित्त विभाग शासन परिपत्रक, क्रमांक : पूरक २०१५/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३, दिनांक : ३१ जानेवारी, २०१५ अनुसार कार्यवाही करण्याबाबत वित्त विभागाच्या व्यय-५, दिनांक : ०५.०२.२०१५ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२०१२२०४४९३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vilas Ramchandra Wanjari

Digitally signed by Vilas Ramchandra Wanjari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Ramchandra Wanjari
Date: 2015.02.20 12:30:01 +05'30'

(विलास रा. वंजारी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) संचालक ( व्यवसाय शिक्षण ), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, मुंबई,
२) संचालक (व्यवसाय प्रशिक्षण ), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र,मुंबई,
३) महालेखापाल-१/२, ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर,
४) महालेखापाल १/२, ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
५) अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र, मुंबई,
६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
७) साशि-१ कार्यासन, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) वित्त विभाग ( व्यय-५ ), मंत्रालय, मुंबई,
९) नियोजन विभाग (१४७१ ), मंत्रालय,मुंबई,
१०) निवड नस्ती, व्यशि- २.